**स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित महिला स्वयंसहायता गटांना देण्यात येणाऱ्या कर्जाच्या व्याज अनुदान योजने अंतर्गत अखर्चित निधी शासनाकडे जमा करणे.**

महाराष्ट्रशासन

**ग्राम विकास विभाग**

**शासननिर्णयक्रमांकः स्वग्रावि-२०१४/प्र.क्र.१३३/योजना-३**

२५, मर्झबान रोड, बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: ९ ऑक्टोबर, २०१४

**वाचा**

**शासन निर्णय क्रमांकः स्वग्रावि २००८/प्र.क्र.१००२/योजना-३,दिनांक ५फेब्रुवारी,२००९**

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेअंतर्गत स्थापित महिला स्वयंसहाय्यता गटास देण्यात येणाऱ्या कर्जाची नियमीत परतफेड करणाऱ्या गटास कर्जफेड पूर्ण झाल्यानंतर व्याज दरातील ४% वगळता उर्वरित व्याजाच्या खर्चाच्या रकमेपैकी ७% पर्यत अनुदान देण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेण्यात आला. त्यास अनुसरुन या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता राज्य शासनाने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना निधी उपलब्ध करुन दिला आहे. केंद्र शासनाने स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेचे रुपांतर राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानात करण्याचा निर्णय घेतला आहे. सदर योजना राज्यात राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान स्वरुपात राबविण्यात येत असल्याने राज्य शासनाच्या व्याज अनुदान योजनेची आवश्यकता राहिली नाही.या योजने अंतर्गत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडे राहिलेला अखर्चित निधी राज्य शासनाकडे जमा करण्याचा निर्णय शासनाच्या विचाराधीन होता.

## शासननिर्णय

केंद्र पुरस्कृत स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित महिला स्वयंसहाय्यता गटास देण्यात येणाऱ्या कर्जाची नियमीत परतफेड करणाऱ्या गटास कर्जफेड पूर्ण झाल्यानंतर व्याज दरातील ४% वगळता उर्वरित व्याजाच्या खर्चाच्या रकमेपैकी ७% पर्यत अनुदान देण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेण्यात आला. त्यास अनुसरुन या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता राज्य शासनाने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना निधी उपलब्ध करुन दिला आहे.

केंद्र शासनाने स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना बंद करुन राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान स्वरुपात राबविण्याचा निर्णय घेतला आहे. या अभियानाच्या तरतुदीनुसार बँकांनी अर्थसहाय्य पुरवठा केलेल्या, अभियानांतर्गत स्वयंसहायता गटांना, केंद्र शासन ७% व्याज दराने, बँकामार्फत व्याज अनुदान उपलब्ध करुन देणार आहे. म्हणजेच केंद्र शासन बँक व्याजदर व ७% व्याजदर यामधील तफावती एवढी तथापि, ५.५% च्या मर्यादेतील रक्कम व्याज अनुदान म्हणून बँकेमार्फत स्वयंसहायता गटाच्या खात्यावर उपलब्ध करुन देणार आहे. या अभियानांतर्गत स्वयंसहायता गटांनी बँकांमार्फत घेतलेल्या कर्ज रकमेपैंकी रु. ३.०० लाखांच्या मर्यादेतील रकमेवर, परतफेडीच्या प्रमाणात व्याज अनुदान अनुज्ञेय करण्यात आलेले आहे.

राज्यात राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान राबविण्यात येत असल्याने राज्य शासनाच्या व्याज अनुदान योजनेची आवश्यकता राहिलेली नाही. तथापि, या योजने अंतर्गत पात्र महिला स्वयंसहायता गटांना अनुज्ञेय अनुदान जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडील शिल्लक निधीतून देण्यात यावे.

वरील प्रमाणे अनुदान वाटप केल्यानंतर जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडील शिल्लक निधी लेखाशिर्ष ०५१५ अंतर्गत ८०० इतर जमा रकमा (०१) इतर जमा रकमा (०१) (०२) संकिर्ण (०५१५००३१)” या अंतर्गत जमा करण्यात यावा. या संदर्भात दिनांक ३१ जानेवारी, २०१५ अखेरपर्यंत कार्यवाही पूर्ण करुन केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी लेखाधिकारी, योजना-२, ग्राम विकास विभाग, २५, मर्झबान रोड, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई-४०० ००१ यांचेकडे पाठवावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ४०३/२०१४, दिनांक १९ ऑगस्ट, २०१४ च्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४१००९१६१३११९४२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: CN = Anil Madhao Kale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Date: 2014.10.17 17:17:23 +05'30'

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सचिव, वित्त विभाग,/ नियोजन विभाग/ महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) विभागीय आयुक्त, (सर्व)
३) जिल्हाधिकारी, (सर्व)
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, १०१ व १०२, मोनार्च प्लाझा, पहिला मजला, सेक्टर-११, बेलापूर, नवी मुंबई.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
६) उप आयुक्त (विकास) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व)
७) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
८) अप्पर संचालक, ए.ग्रा.वि.का.कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) लेखाधिकारी, योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई-४०० ००१
१०) निवड नस्ती.